
माझ्या मैत्रिणीला
डाउन सिंड्रोम आहे

माझ्या मैत्रिणीला

# डाउन सिंड्रोम

आहे





माझं नाव कारमेन आहे. ही माझी मैत्रीण सारा आहे.
साराची आणि माझी भेट शाळेत झाली.
पण आम्ही डान्स क्लासला पण सोबत जातो.
साराला डाउन सिंड्रोम आहे.



सारासोबत खूप मजा येते. माझ्या ओळखीच्या सगळ्या लोकांपैकी सारा  जास्त हसतमुख असते. साराबरोबर थट्टामस्करी करायला मला आवडतं. तिचं हसू बदकाच्या आवाजासारखं आहे.

**तुम्हाला हे माहिती आहे का?**

काही मुलांना जन्मत:च डाऊन सिंड्रोम असतो.
हा विकार गरीबश्रीमंत आणि कोणत्याही जातिधर्माच्या माणसांना असू शकतो.
या विकाराचं कारण आजतागायत कळलेलं नाही.
त्याच्यावर कोणताही उपायही नाही.

सारा इतर मुलांपेक्षा जरा वेगळी दिसते.
तसं तर आपण सगळेच एकमेकांपेक्षा जरा वेगळे दिसतो. नाही का?
आपण सगळे एकसारखेच दिसत असतो तर आयुष्य किती कंटाळवाणं झालं असतं..!






तुम्हाला हे माहिती आहे?

डाऊन सिंड्रोम असलेली मुलं बुटकी असतात.
त्यांचे डोळे बारीक आणि तिरळे दिसतात.
प्रत्यक्षात, डाऊन सिंड्रोम असलेली प्रत्येक
व्यक्ती वेगळी दिसते.



कधी कधी मुलं साराची चेष्टा
करतात.



तेव्हा मला खूप राग येतो.
कोणाचीही अशी चेष्टा करणं चुकीचं आहे.

साराची भेट होण्याआधी माझ्या वयाच्या अशा कोणत्याच मुलीला मी ओळखत नव्हते. जी माझ्या वयाची असल्यापासून चष्मा घालते. आता मात्र मी एकटी नाहीये. सारा आणि मी आमच्या चष्म्यांची अदलाबदल करत असतो..
त्यामुळे या रंगीबेरंगी जगाकडे आम्ही वेगळ्या नजरेनं पाहू शकतो.





साराला आणि मला बॅले हा नृत्यप्रकार आवडतो.
प्रत्येक वर्षी डिसेंबरमध्ये आम्ही “नटक्रॅकर” हा बॅले करतो.
या वर्षी साराला नाचात परी व्हायचं आहे.
मला एक उंदीर व्हायचं आहे.



तुम्हाला हे माहिती आहे?
डाऊन सिंड्रोम असलेल्या मुलांनाही इतर मुलं जे करतात ते सगळं करायला आवडतं.
त्यांना खेळायला, चित्रपट पहायला, संगीत ऐकायला आणि मित्रांबरोबर फिरायला खूप आवडतं.

साराला शाळेत जरा जास्त प्रमाणात मदत लागते.
ती गणित आणि वाचन शिकायला स्पेशल क्लासमध्ये जाते.
तिथे शिक्षक तिला एकटीला शिकवतात.







तुम्हाला हे माहिती आहे?
डाऊन सिंड्रोम असलेल्या मुलांना शिकायला जरा जड जातं. आपल्या वयाच्या इतर मुलांपेक्षा ते जरा धीम्या गतीनं शिकतात.

सारा शाळेत नसेल तेव्हा मला तिची खूप आठवण येते.
तिला नेहमी तिच्या डॉक्टरांकडे जावं लागतं.
मला कधी कधी त्याचीही भीती वाटते.





तुम्हाला हे माहिती आहे?
डाऊन सिंड्रोम असलेल्या मुलांना इतर आजारही जास्त सतावतात. डाउन सिंड्रोम असलेल्या निम्म्या मुलांना हृदयविकाराचा त्रास होतो. त्यांना दिसण्याच्या किंवा ऐकू कमी येण्याच्याही समस्या असू शकतात.

सारालाजेव्हा उदास वाटतं
तेव्हा मी तिला हसवायचा प्रयत्न करते.
ती पण मला खुष करायला धडपडते.
ती माझ्यासाठी कशाचंतरी चित्र काढते.
किंवा मला तिचं लाडकं ब्रेसलेट घालायला देते.





मोठं झाल्यावर साराला लहान मुलांच्या
इस्पितळात काम करायचं आहे.
तिला लोकांना मदत करायला आवडतं.
ती ते काम चांगलं करेल याची मला खात्री आहे.





**तुम्हाला हे माहिती आहे?**

डाऊन सिंड्रोम असलेले कित्येक लोक
वेगवेगळ्या क्षेत्रात काम करतात.



कदाचित सारा मला एक्स रे
मशिन चालवायला देईल.

मला साराशी मैत्री असलेली आवडते.
ती शांत आहे.
मी कशामुळे आनंदी होऊ शकते हे तिला कळतं.





## डाऊन सिंड्रोम म्हणजे काय?

डाऊन सिंड्रोम हा एक विकार आहे. जो काही मुलांना जन्मजात असतो. डाऊन सिंड्रोममुळे मुलाच्या शरीराची आणि मेंदूची वाढ खुंटते. पेशींचं विभाजन चुकीच्या पध्दतीनं झाल्यामुळे डाऊन सिंड्रोम होतो. छोट्या पेशींच्या समूहानं जीव निर्माण होतो. डाऊन सिंड्रोमवर काहीच उपाय नाही. डाऊन सिंड्रोम असलेली मुलं इतर मुलांपेक्षा वेगळी दिसतात. सहसा, त्यांचा चेहरा जरासा चपटा असतो, डोळे वर पहाणारे / चकणे असतात आणि कान थोडे छोटे असतात.

या मुलांना इतर वैद्यकीय समस्याही असतात. उदाहरणार्थ, हृदयविकार, पोटाच्या तक्रारी इ. डाऊन सिंड्रोम असलेली मुलं इतर मुलांच्या तुलनेत मंदगतीनं वाढतात. थेरपी आणि इतर काही उपचारांमुळे त्यांना चालायला, बोलायला आणि इतर काही जीवनावश्यक कौशल्यं शिकायला मदत होते. डाऊन सिंड्रोम असलेली मुलं विविध क्षेत्रात उदाहरणार्थ, स्वत:चा व्यवसाय, वैद्यकीय क्षेत्र, कलेची वेगवेगळी क्षेत्रं अशा ठिकाणी काम करतात. काहीजण कॉलेजशिक्षणही घेतात.